वनक्षेत्रामध्ये टसर रेशीम लागवड कार्यक्रमास प्रोत्साहन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: एफएलडी-२०१५/प्र.क्र.१५/फ-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २४/०६/२०१५

वाचा :-

पर्यावरण, वन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.२-१/२००३-FC (Pt-III), दि.०७/०६/२००४.

**शासन परिपत्रक:-**

केंद्र शासनाने वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत वनजमिनीवर टसर रेशीम लागवडीसाठी वनजमिन वळती करणाबाबत दिनांक ०७/०६/२००४ च्या पत्रान्वये सुधारित मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. राष्ट्रीय वन धोरण, १९८८ नुसार ज्यांचा उदरनिर्वाह वनांमधील विविध उत्पादनांशी निगडीत आहे, त्यांना वन क्षेत्रांचे संरक्षण व विकास करण्यासाठी प्रोत्साहन देऊन स्वतःची ओळख करण्यास उद्युक्त केले पाहिजे. जंगलातील विशेष अधिकार आणि सवलतींचा मुख्य उद्देश प्रामुख्याने वन क्षेत्रातील विशेषत: आदिवासी समुदायाच्या आर्थिक गरजा भागविणे आहे. वन विकास महामंडळे तसेच वन व्यवस्थापनासाठी जबाबदार सर्व संस्थांनी आदिवासी लोकांना जंगलाच्या संरक्षण, संवर्धन आणि विकासाबरोबरच त्यांना रोजगार निर्मितीची साधने उपलब्ध करुन देण्यास मदत करावी, जेणेकरुन वनांच्या शाश्वत विकासास हातभार लागेल.

टसर रेशीम उत्पादन हे मध्य व पूर्व भारतातील अनेक आदिवासी कुटुंबे व मूळ परंपरागत वननिवासी लोकांचे उदरनिर्वाहाचे मूळ साधन आहे. त्यामुळे वन्य रेशीम उत्पादन हे त्या लोकांचे उदरनिर्वाहासाठी वनांवरील अवलंबित्व कमी करण्यास मदत करेल आणि त्यामुळे वनांचे संवर्धन आणि संरक्षण होण्यास मदत होईल. रेशीम लागवडीमध्ये वननिवासी व्यक्तींच्या आर्थिक गरजा भागविण्याची प्रचंड क्षमता आहे. सदर कार्यक्रम हा महत्वपूर्ण असल्याने व सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी योग्य प्रकारे व त्वरेने होण्याकरीता शासन खालील मार्गदर्शक सूचना या परिपत्रकाव्दारे देत आहे:-

१. वन विभागाने वनांमध्ये राहणारे आदिवासी लोकसमूह तसेच इतर परंपरागत वननिवासी लोकांच्या उदरनिर्वाहाकरिता वन उत्पादनांवरील अवलंबित्व कमी करण्यासाठी त्यांना रेशीम लागवड करण्यास प्रोत्साहन द्यावे. उपरोक्त कार्यासाठी प्राधान्यक्रम हा आदिवासी लोकांना द्यावा.

२. वन विभागाने रेशमाच्या उत्पादनासाठी रेशमी किडयांची जोपासना ही नैसर्गिकरीत्या वाढ झालेल्या वनस्पतींवरच करण्याची परवानगी द्यावी.

३. केंद्रीय रेशीम उत्पादन संस्था तसेच राज्य रेशीम उत्पादन संस्था रेशीम उत्पादकांना रेशीम लागवडीचे प्रशिक्षण देतील.

४. वनक्षेत्राच्या परिसरातील आदिवासी व बिगर आदिवासी त्यांच्या उदरनिर्वाहाकरीता रेशीम उत्पादन करण्यासाठी टसर रेशीमसाठी रोपांची लागवड करु शकतील. त्यासाठी वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत परवानगीची आवश्यकता असणार नाही. संबंधित उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपविभागीय वन अधिकारी रेशीम लागवड व त्यामध्ये समाविष्ट लोकयाची अद्ययावत लेखी नोंद करुन ठेवतील.

५. केंद्रीय रेशीम उत्पादन संस्था तसेच राज्य रेशीम उत्पादन संस्था रेशीम उत्पादकांना नोंदवहींचे वाटप करतील.

६. वनक्षेत्रावर वन्य रेशीम उत्पादनासाठी इतर वृक्षांची लागवड ही आवश्यक रेशीम किड्यांचे कोष निर्माण करण्यासाठी केली जात असेल तर त्यास वानिकी उपक्रम समजण्यात यावा व त्याकरीता वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत परवानगी लागणार नाही. परंतु असे करताना इतर वृक्षांची तोड करता येणार नाही. रेशीम किड्यांचे कोष निर्माण करण्यासाठी कमीत कमी तीन जातींच्या रोपांची लागवड करणे आवश्यक आहे. तसेच त्यापैकी कोणत्याही एका जातीच्या वृक्षाची लागवड ही ५० % पेक्षा जास्त क्षेत्रावर नसावी.

७. रेशीम लागवडीसाठी खालील वृक्षांच्या जाती या होस्ट म्हणून वापरता येतील.

| अनु. क्र. | शास्त्रीय नाव | स्थानिक भाषेतील नाव |
|---|---|---|
| | **टसर रेशीमासाठी** | |
| १. | *Terminalia arjuna* | अर्जुन / आजन |
| २. | *Terminalia tomentosa* | ऐन / साजा / सादडा |
| ३. | *Lagerstroemia indica* | धायती |
| ४. | *Lagerstroemia parviflora* | लेंडिया |
| ५. | *Syzygium cumini* | जामुन |
| ६. | *Ziziphus mauritiana* | बेर |

८. वन विभाग/संयुक्त वन व्यवस्थापन समिती/इतर समकक्ष समितीव्दारे सदरची लागवड ही अवनत वनजमिनीवर करावी. सदर कार्यात सार्वजनिक तसेच खाजगी संस्थांचा अर्थिक सहभाग असावा जेणेकरुन अधिकाधिक स्थानिक वृक्ष प्रजातींची रेशीम किडे जोपासना करण्यासाठी लागवड करता येईल. केंद्रीय रेशीम उत्पादन संस्था तसेच राज्य रेशीम उत्पादन संस्थांनी सदरच्या कार्यासाठी वन विभागांचे व गावातील लोकांचे सहकार्यातून आराखडा तयार करावा.

९. संबंधित उप वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपविभागीय वन अधिकारी यांनी केंद्रीय रेशीम उत्पादन संस्था तसेच राज्य रेशीम उत्पादन संस्थांनी घालून दिलेले तांत्रिक निकष याच्या आधारावरच रेशीम किड्यांचे संगोपन केले जाईल याची खात्री करावी.

१०. वनांचे पारिस्थितिकीय संवर्धन अबाधित राखण्यासाठी कोणत्याही हानिकारक रेशीम किड्यांची जात किंवा संकरीत प्रजातीची वनजमिनीवर लागवड करता येणार नाही.

११. रेशीम लागवड ही राष्ट्रीय उद्याने, अभयारण्ये आणि जैवविविधता संवेदनशील क्षेत्रात करता येणार नाही.

१२. संबंधित उप वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपविभागीय वन अधिकारी, संचालक (रेशीम उत्पादन विभाग) आणि केंद्रीय रेशीम उत्पादन संस्थेचे प्रतिनिधी एकत्रितरित्या रेशीम लागवड केलेल्या प्रजातींचे व रेशीम किड्यांचे द्विवार्षिक परिक्षण करतील. त्याचा निरिक्षण अहवाल प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे मार्फत पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालयाच्या संबंधित क्षेत्रिय कार्यालयास सादर केला जाईल व त्याची प्रत शासनास सादर केली जाईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०६२४१६५२५४४९१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.06.24 16:55:04 +05'30'

( वीरेन्द्र तिवारी )

**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्यव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
९. उप वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
१०. विभागीय वन अधिकारी / उप विभागीय वन अधिकारी (सर्व)
११. निवडनस्ती (फ-१०)